मध्यावधी बदली करताना बदली कायद्यातील तरतूदींचे पालन करण्यासंदर्भात -
गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या करताना मा. मुख्यमंत्री महोदयांची मान्यता घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही-२०१४/मुस-३४/प्र.क्र.३७९/१२,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक- २९, मे २०१५

वाचा -

१) सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१ दि.१२.०५.२००६.

२) शासन अधिसूचना क्रमांक: सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२ दि.२५.०५.२००६.

३) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. ३१.०१.२०१४.

४) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. २०.०५.२०१४.

५) शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही २०१४/व्हीआयपी२८४/प्र.क्र.३६२/१२, दि. २६.११.२०१४

६) शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २९३/प्र.क्र.३६२/१२, दि.०९.१२.२०१४

७) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. १९.०१.२०१५.

८) शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/मुस-३४/प्र.क्र.३७९/१२, दि.११.०२.२०१५.

<u>प्रस्तावना -</u>

सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१ दि.१२.०५.२००६. अन्वये महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ (बदल्यांचा कायदा) लागू केलेला आहे. या अधिनियमातील तरतुदीनुसार गट-अ ते गट-ड मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकाऱ्यांचा तक्ता कलम ६ मध्ये देण्यात आला आहे. या कलमातील परंतुक १ नुसार, तक्त्यातील नोंद (ख) मधील अधिकाऱ्यांच्याबाबतीत, विभागीय किंवा जिल्हा स्तरावर काम करीत असलेला विभाग प्रमुख, अशा अधिकाऱ्यांची विभागांतर्गत बदली करण्यास सक्षम असेल आणि जिल्हा प्रमुख जिल्ह्यांतर्गत बदली करण्यास सक्षम असेल अशी तरतूद करण्यात आली आहे.

प्रशासनातील कालापव्यय टाळून, निर्णय प्रक्रियेतील टप्पे कमी होण्याच्या दृष्टीने, विभागातील तसेच त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे बदल्यांच्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्याच्या अनुषंगाने, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील कलम ६ खालील परंतुक २ व कलम ७ यामधील तरतूदी एकत्रित विचारात घेवून, बदली करण्यास सक्षम प्राधिकाऱ्याचे बदल्यांचे अधिकार, त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही करण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांना दि.२६.११.२०१४ च्या व दि.०९.१२.२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत.

याखेरीज मध्यावधी बदल्या करताना बदली प्राधिकारी व त्यांच्या लगतच्या वरिष्ठ प्राधिकारी यांनी कोणती काळजी घ्यावी याबाबतच्या मार्गदर्शक सूचना दि.११.०२.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये सूचना दिलेल्या आहेत.

वरीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असल्या तरी गट-अ अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या करताना कोणती दक्षता घ्यावी याबाबतच्या मार्गदर्शक सूचना विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

प्रस्तावनातील बाबी विचारात घेऊन गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यांचा पदावधी पूर्ण होण्यापूर्वी किंवा एप्रिल, मे महिन्याव्यतिरिक्त वर्षातील इतर कोणत्याही वेळी बदली करावयाची झाल्यास महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ (बदल्यांचा कायदा) च्या कलम ४(४) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांच्या बदलीचे कारण नोंदवून अशा बदल्यांना मा. मुख्यमंत्री महोदयांची मान्यता घेणे आवश्यक आहे. मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेखेरीज गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या न करण्याची सर्व प्रशासकीय विभागांच्या सचिवांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२९१६५२३८१२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.05.29 17:15:46 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय)**

अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

प्रत,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,

५. सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,

६. मा.मुख्य सचिव,

७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

८. सर्व मंत्रालयीन विभाग,

९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

१०. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

११. *प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१३.*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,

१४. *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मंबई,

१५.*सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,

१६.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,

१७.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,

१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,

२०. *सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई,

२१. *प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई ४०० ००१,

२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (२ प्रती प्रसिध्दीकरिता),

२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

२५. सर्व विभागीय आयुक्त,

२६. सर्व जिल्हाधिकारी,

२७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२९. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

३०. सामान्य प्रशासन विभाग/का. ३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरिता),

३१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)

३२.बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.पी. भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई ७४ (५ प्रती)

३३.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)

३४.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)

३५.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५ प्रती),

३६.इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती),

३७. नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती),

३८.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती),

३९.महाराष्ट्र नवनिर्माण सेना, कृष्णाकुंज, एम.बी.राऊत रोड, शिवाजी पार्क, दादर, मुंबई २८ (५ प्रती),

४०.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

४१.निवड नस्ती.